**ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीबाबत सुधारित मार्गदर्शक सूचना**

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन शुध्दीपत्रक क्रमांकः ग्रापाधो-१११४/प्र.क्र.५२/पापु-०७

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१
तारीख: १० मार्च, २०१५

**वाचा:**

१) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रापाधो-१११४/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक १७ ऑक्टोबर,२०१४
२) **महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे पत्र क्रमांकः** मजीप्रा/सस/तांशा-३/११४७, दिनांक ०२ डिसेंबर,२०१४

**प्रस्तावना :**

संदर्भाधिन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या असून या शासन निर्णयातील तरतुदीनुसार महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत देखभाल दुरुस्ती करण्यात येत असलेल्या योजनांच्या बाबतही पाणीपट्टी व शासन अनुदानाची रक्कम संबंधित जिल्हा देखभाल दुरुस्ती निधीत जमा करण्याचे व सदर रक्कम महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास जिल्हा परिषदांमार्फत वितरीत करण्याचे निश्चित केले आहे.

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत संचलन व देखभाल दुरुस्ती केल्या जात असलेल्या ग्रामीण पाणी पुरवठा योजना तोट्यात असल्याने या योजनांच्या संचलन व देखभाल दुरुस्तीकरीता निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने संदर्भाधिन क्र.०२ येथील पत्रान्वये केली आहे.

सद्य:स्थितीत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत देखभाल दुरुस्ती केल्या जात असलेल्या तोट्यातील योजनांचा तोटा भरुन काढण्यासाठी विभागाकडे पुरेसा निधी उपलब्ध नसल्याने महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास देखभाल दुरुस्ती प्रोत्साहन अनुदान स्वरुपातील मदत जिल्हा परिषदांमार्फत उपलब्ध करुन देण्याऐवजी थेट उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने संदर्भाधिन क्र.१ येथील शासन निर्णयात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन शुध्दीपत्रक :

शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१११४/प्र.क्र.५२/पापु-०७, दि.१७ ऑक्टोबर,२०१४ रोजीच्या शासन निर्णयातील अ.क्र. (२) जिल्हास्तरीय देखभाल व दुरुस्ती निधी यामधील "महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत देखभाल दुरुस्ती करण्यात येणाऱ्या योजनांच्या बाबतीत पाणीपट्टी व शासन अनुदानाची रक्कम संबंधित जिल्हा देखभाल दुरुस्ती निधीतच जमा राहील. सदर रक्कम महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास जिल्हा परिषदांमार्फत वितरीत करण्यात येईल." ही तरतूद या शासन शुध्दीपत्रकान्वये रद्द करण्यात येत आहे.

महाराष्ट्र जीवन प्राधिकरण संचलन व देखभाल दुरुस्ती करीत असलेल्या ग्रामीण पाणी पुरवठा योजनांना देखभाल दुरुस्ती प्रोत्साहन अनुदानाची रक्कम शासनामार्फत थेट महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास अदा करण्यात येईल.

दि.१७ ऑक्टोबर,२०१४ रोजीच्या शासन निर्णयामधून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास सुट देण्यात येत असून महाराष्ट्र जीवन प्राधिकरण संचलन व देखभाल दुरुस्ती करीत असलेल्या ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी स्वत:ची देखभाल दुरुस्ती प्रक्रिया राबविण्यास महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास मुभा देण्यात येत आहे.

महाराष्ट्र जीवन प्राधिकरण संचलन व देखभाल दुरुस्ती करीत असलेल्या ग्रामीण पाणी पुरवठा योजनांचा तोटा भरुन काढण्याचा निर्णय निधीची उपलब्धता झाल्यानंतर यथावकाश घेण्यात येईल.

सदर शासन शुध्दीपत्रकातील तरतुदी या शासनाचे पुढील आदेश होईपर्यंत लागू राहतील. शासनाचे यासंदर्भातील पुढील आदेश झाल्यानंतर या शुध्दीपत्रकातील तरतुदी आपोआप रद्द होतील.

सदर शासन शुध्दीपत्रक हे महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक 201503091451586028 असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAVRIKAR AJAY KISHANRAO

Digitally signed by SAVRIKAR AJAY KISHANRAO
DN: CN = SAVRIKAR AJAY KISHANRAO, C = IN, S = Maharashtra, O = WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, OU = WATER SUPPLY AND SANITATION,CID - 917821
Date: 2015.03.10 12:54:27 +05'30'

**(अजय सावरीकर)**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

२. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. सर्व सन्माननीय विधिमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई.
६. मा.मुख्य सचिव यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई.
७. सर्व अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालयीन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
९. विभागीय आयुक्त (सर्व)
१०.संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
११.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१२.संचालक, समाज कल्याण संचालनालय, पुणे.
१३.संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था, बेलापूर, नवी मुंबई.
१४.महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)
१५.महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)
१६.मुख्य अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
१७.अधीक्षक अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
१८.कार्यकारी अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
१९.कार्यकारी अभियंता (सर्व), ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
२०.मंत्रालयीन इतर सर्व विभाग व त्यांच्या अधिनस्त असलेली सर्व कार्यालये.
२१.पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने.
२२.निवडनस्ती, कार्यासन पापु-०७.